**औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेतील राज्य स्तरावरील निर्लेखनास समितीने शिफारस केलेल्या परंतु निर्लेखन आदेश निर्गमित न झालेल्या प्रलंबित मशिनच्या निर्लेखनास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : निर्लेख २०२१/प्र.क्र. १२७/व्यशि-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुख्य इमारत,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २५ नोव्हेंबर, २०२१

वाचा -

१) संचालक, व्यवसायिक शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे दि.०९.११.२०२१ रोजीचे पत्र.

२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक :- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५

३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक :- विअप्र २०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि.१९.०१.२०१६

**प्रस्तावना :-**

औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील जुनी व निकामी यंत्रसामुग्री निर्लेखित व विक्री करण्याबाबत संचालक, व्यवसायिक शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या दिनांक ०१.१०.२०१५ च्या निर्णयाद्वारे समिती गठीत करण्यात आली आहे. तसेच सदर प्रक्रिया राबविण्याबाबत पूर्वतयारी करण्याबाबतच्या सूचनाही देण्यात आलेल्या आहेत. त्यानुषंगाने संचालक, व्यवसायिक शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अधिनस्त प्रादेशिक कार्यालय, नागपूर विभागातील औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागपूर येथील **यंत्रसामुग्री निर्लेखनाबाबत दिनांक ३१.०८.२०२१ रोजी समितीची बैठक आयोजित करुन यंत्रसामुग्री निर्लेखनाचा निर्णय घेण्यात आला.** त्यानुषंगाने संचालक, व्यवसायिक शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांच्या संदर्भ क्र.१ येथील पत्राद्वारे शासनास प्रस्ताव सादर केला आहे. सदर औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेतील राज्यस्तरावरील निर्लेखनास समितीने शिफारस केलेल्या परंतु निर्लेखन आदेश निर्गमित न झालेल्या प्रलंबित यंत्रसामुग्रीच्या निर्लेखनास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय** :-

संचालक, व्यवसायिक शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अधिनस्त नागपूर प्रादेशिक कार्यालयांतर्गत औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेतील राज्य स्तरावरील निर्लेखनास निर्लेखन समितीने शिफारस केलेल्या परंतु निर्लेखन आदेश निर्गमित न झालेल्या प्रलंबित यंत्रसामुग्रीच्या निर्लेखनाचा खालीलप्रमाणे प्रस्ताव प्राप्त झाला आहे.

**निर्लेखन करावयाची यंत्रसामुग्री**

| संस्थेचे नाव | प्रपत्र क मधील निर्लेखनासाठी यंत्र सामुग्रीचा अनुक्रमांक | किमान घसारा किंमत रुपये |
|---|---|---|
| औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागपूर, जि.नागपूर | अ.क्र.१ ते ४३<br>एकूण ४७ नग | रु.१०,०६,९५५/- |

२. सदर प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र २०१५/ प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दिनांक १९.०१.२०१६ तसेच वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग-पहिला उपविभाग-१, अ.क्र.२२, पुस्तिकेतील अ.क्र.२२, नियम क्र.१४६ मध्ये जड वस्तुसंग्रहालयातील निरुपयोगी वस्तूंचे अटी व कार्यपद्धतीचे अनुपालन करुन निर्लेखित करणेबाबत प्रशासकीय विभागास अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी सादर केलेल्या उपरोक्त यंत्रसामुग्री निर्लेखनाच्या प्रस्तावातील प्रपत्र क मधील निर्लेखनासाठी यंत्रसामुग्रीच्या अनुक्रमांकाप्रमाणे मंजुरी देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११२५१६४९२०५९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRABHAKAR A SANKHE

Digitally signed by PRABHAKAR A SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90, pseudonym=11AF006A9B8244D291C83FCA56E433781EE9E76C, serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750, cn=PRABHAKAR A SANKHE
Date: 2021.11.25 16:54:18 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, व्यवसायिक शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय, नागपूर.
३. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागपूर.
४. निवडनस्ती (व्यशि-४)